ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिद्ध करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः निविदा-२०२१/प्र.क्र.१३/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख : २९ ऑक्टोबर, २०२१

वाचा :

१. **शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांकः** संकीर्ण २०१०/ प्र.क्र.१७२/पंरा-७, दिनांक १९ ऑक्टोबर, २०११.
२. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** निविदा २०१२/प्र.क्र.९७/पंरा-७, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३.
३. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः**निविदा २०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७, दिनांक २६ जुलै, २०१६.
४. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १३ जानेवारी, २०२१.
५. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ०८ एप्रिल, २०२१.
६. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ०९ जून, २०२१.
७. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १० ऑगस्ट, २०२१.

प्रस्तावना :

दिनांक ०१ जानेवारी, २०१२ पासून पंचायत राज संस्थांमध्ये विविध विकासात्मक कामे व विकास कामांसाठी लागणाऱ्या सेवा तथा वस्तुंची खरेदी यासाठी ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करणे संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये बंधनकारक करण्यात आले आहे. ई-निविदा प्रणाली अंतर्गत सुधारित कार्यपद्धती व निविदा सूचनेचा कालावधी संदर्भ क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आला आहे.

०२. सन २०२१-२२ या अर्थिक वर्षात नजीकच्या काळात विधानपरिषद निवडणूक, जिल्हा परिषद निवडणूक, ग्रामपंचायत निवडणूकांमुळे आचारसंहिता लागू होण्याची शक्यता असल्याकारणाने, ग्राम विकास विभागांतर्गत रस्त्यांची कामे, पुलांच्या दुरूस्तीची कामे (महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेमधील कामे वगळून) व अन्य लोकहिताची विविध विकास कामे तातडीने व वेळेवर पुर्ण होणे आवश्यक असल्याने, सदर कामांची जाहीर निविदा सूचना काढणे, निविदा प्रक्रिया पुर्ण करणे व प्रत्यक्ष कार्यारंभ आदेश देऊन काम सुरू करणे ही सर्व प्रक्रिया त्वरेने पुर्ण करण्याच्या दृष्टीने अल्पकालावधीच्या निविदा सूचनेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

पंचायत राज संस्थांतर्गत रस्त्यांची कामे व पुलाच्या दुरूस्तीची कामे, (महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेमधील कामे वगळून) जिल्हा परिषद स्वीय निधी, तीर्थक्षेत्र, २५१५ मुलभुत सुविधा तसेच अन्य लोकहिताची विविध विकास कामे त्वरेने मार्गी लागण्याच्या दृष्टीने ग्राम विकास विभागाच्या उक्त संदर्भाधीन दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-४ (२) व दिनांक २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये सदर निविदा बोलाविण्यासाठी निर्धारित केलेला कालावधी, उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ७ येथील दिनांक १० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये, कामांच्या निविदेच्या किंमतीनुसार, अल्प कालावधी निश्चित करून दिनांक ३१ ऑक्टोबर, २०२१ पर्यंत मंजुरी देण्यात आलेली होती. तथापि, उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ७ येथील दिनांक १० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या परिपत्रकातील, ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचनेची मुदत या परिपत्रकान्वये, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२१ पर्यंत वाढविण्यात येत आहे.

०२. सदर परिपत्रक सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व खाते प्रमुख तसेच लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण मुलभूत सुविधा पुरविणे (२५१५ १२३८) या अंतर्गतची कामे ज्या ठिकाणी सार्वजनिक बांधकाम मंडळ यांच्या अधिनस्त यंत्रणा कार्यरत असेल, अशा यंत्रणांच्या निदर्शनास आणून उपरोल्लेखित कामे मुदतीत पुर्ण होतील याची दक्षता घ्यावी. दिनांक ०१ डिसेंबर, २०२१ पासून वरील सवलत आपोआप रद्द होऊन, संदर्भीय शासन निर्णय दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ व दिनांक २६ जुलै, २०१६ मधील या संदर्भातील तरतूदी पुनःश्च लागू होतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९११३७०११८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.10.29 12:09:05 +05'30'

**(प्रविण जैन)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.उपमुख्य मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
७. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
८. मा.सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मा.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१२. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१३. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यंत्रणा.
१४. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
१५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६. कार्यकारी अभियंता (बांधकाम, लघुपाटबंधारे, पाणी पुरवठा विभाग), जिल्हा परिषद, सर्व.
१७. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यंत्रणा.
१८. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सर्व.
१९. ग्राम विकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२०. निवडनस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.